**साखर आयुक्त कार्यालयाच्या अधिनस्त प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांच्या एकूण ९ कार्यालयांना कार्यालयीन भाडेपट्टी व कराची रक्कम अदा करण्याकरीता पुनर्विनियोजनाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : ससाका २०२२ /प्र.क्र.८४/२५-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय(वि),मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० मार्च, २०२३

**संदर्भ :-** १) साखर आयुक्त, पुणे यांचे साआ/कक्ष-४/२४२५००३१/२४२५१०५४/भाडेपट्टी व कर /पुर्न/अनुदान/२३/५०/८३७, दि.०६/०३/२०२३.
२) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.पुनर्वि-२३२३/प्र.क्र.२५/२०२३/१७-स, दि.२९/०३/२०२३

**<u>प्रस्तावना:-</u>**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षामध्ये साखर आयुक्त कार्यालयाच्या अधिनस्त प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांच्या एकूण ९ कार्यालयांना कार्यालयीन भाडेपट्टी व कराची रक्कम अदा करण्याकरीता संदर्भाधीन पत्राने साखर आयुक्तांनी विनंती केल्यानुसार निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

साखर आयुक्त कार्यालयाच्या अधिनस्त प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांच्या एकूण ९ कार्यालयांकरिता १४- भाडेपट्टी व कर या बाबीअंतर्गत रू.२६.२१ लक्ष एवढी रक्कम पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करण्यासंर्भात संदर्भ क्र.२ अन्वये मान्यता प्राप्त झालेली आहे. त्याअनुषंगाने सदर ९ कार्यालयापैकी मागणी क्र.व्ही-२ अंतर्गत मुख्यलेखाशिर्ष-२४२५ सहकार १, उपलेखाशिर्ष -(०१) (०२) साखर आयुक्त अनिवार्य (२४२५००३१) या लेखाशिर्षाअंतर्गत भाडेपट्टी व कर या प्रयोजनासाठी ४ कार्यालयांना रू.१८,३८,६९९/- (अक्षरी रु. अठरा लक्ष अडतीस हजार सहाशे नव्याण्णव फक्त) इतका निधी व मागणी क्र. व्ही-२ अंतर्गत उपलेखाशिर्ष -(०१) (०८) साखर आयुक्तालयाचे बळकटीकरण अनिवार्य (२४२५१०५४) या लेखाशिर्षाअंतर्गत ५ कार्यालयांना रू.७,८१,९२१/- (अक्षरी रु. सात लक्ष एक्क्याऐंशी हजार नऊशे एकवीस फक्त) असा एकूण रू. २६,२०,६२०/- (सव्वीस लक्ष वीस हजार सहाशे वीस फक्त) इतका निधी वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधी साखर आयुक्त कार्यालयाच्या अधिनस्त एकूण ९ प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे कार्यालयांच्या भाडेपट्टी व कर या प्रयोजनासाठी

मंजूर असून त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करण्याची तसेच निधीच्या विनियोगानंतर उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी व लेखाधिकारी यांनी घ्यावी.

प्रस्तूत शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७६/ २०२३/ व्यय-२, दि.२५/०३/२०२३ व या विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक पुनर्वि-२३२३/ प्र.क्र.२५/ २०२३/ १७-स, दि.२९/०३/२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०३३०१५५२१५५४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHINGADE ANKUSH PANDURANG

Digitally signed by SHINGADE ANKUSH PANDURANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, pseudonym=18BA78965A42BF3AA081DE760471DB6306C88F1D, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=SHINGADE ANKUSH PANDURANG
Date: 2023.03.30 16:01:02 +05'30'

**(अं.पां.शिंगाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
२) प्रधान महालेखापरिक्षक, लेखापरिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) महालेखापाल -१, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल -२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे (३प्रती)
१०) सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर)
११) वित्त विभाग (व्यय-२), कराधान-३ व अर्थसंकल्प-१२, (अर्थोपाय शाखा)
१२) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
१३) सहसंचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय इमारत,मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी, १६-स तथा वेब को-ऑर्डिनेटर, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) अवर सचिव (कार्य-१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६) निवड नस्ती (२५-स).